**माझी वसुंधरा अभियान ४.० अंतर्गत प्राप्त बक्षीस रकमेतून हाती घ्यावायच्या कामांसाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास (DPR) प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. घुलेवाडी ग्रामपंचायत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अभियान-२०२४/प्र. क्र.०४(३८)/तां. क.१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
**दिनांक:२६ मे, २०२५**

**वाचा:**

(१) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान- २०२४/प्र.क्र. ६६/ तां. क.१ दिनांक २७ सप्टेंबर, २०२४

(२) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान- २०२१/प्र. क्र. ५७/ तां. क्र. १, दिनांक ८ फेब्रुवारी, २०२२

(३) प्रशासकीय मान्यता देण्यासाठी गठीत समितीच्या दिनांक ०२ मे, २०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :**

माझी वसुंधरा अभियान ४.० मधील १२ गटातील विजेत्या स्थानिक स्वराज्य संस्थांना रोख रकमांची पारितोषिके व सदर बक्षीस रकमेच्या विनियोगाची कार्यपध्दती संदर्भीय क्रमांक (१) येथील दिनांक २७ सप्टेंबर, २०२४ च्या शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आली आहे. त्यानुसार, स्थानिक स्वराज्य संस्थांनी पारितोषिकाच्या रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामांचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून, त्यास संदर्भीय क्रमांक (२) येथील दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२२ च्या शासन निर्णयान्वये मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठित समितीकडून प्रशासकीय मान्यता घ्यावयाची आहे.

२. त्यानुसार, बक्षीस मिळालेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांकडून प्राप्त झालेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०२ मे, २०२५ रोजी झालेल्या बैठकीत स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालावर चर्चा होवून समितीने शिफारशी केल्या आहेत. समितीने केलेल्या शिफारशीनुसार संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून माझी वसुंधरा अभियान ४.० अंतर्गत घुलेवाडी ग्रामपंचायतीस प्राप्त होणाऱ्या एकूण रू २.२५कोटी बक्षिसांच्या रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामांचा रू.२,२५,००,०००.०० (रुपये दोन कोटी पंचवीस लक्ष फक्त) किंमतीचा सविस्तर प्रकल्प अहवाल ग्रामविकास अधिकारी, घुलेवाडी ग्रामपंचायत यांनी कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद अहिल्यानगर, यांची तांत्रिक मान्यता घेवून सादर केला आहे. घुलेवाडी ग्रामपंचायतीने सादर केलेला सदर प्रस्ताव मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय

बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या समितीच्या दिनांक,०२ मे, २०२५ रोजी झालेल्या बैठकीत विचारात घेण्यात आला. सदर समितीने केलेल्या शिफारशीनुसार, घुलेवाडी_ग्रामपंचायतीने सादर केलेल्या एकूण रू. २,२५,००,०००.०० (रुपये दोन कोटी पंचवीस लक्ष फक्त) किंमतीच्या सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांना **खालील अटी व शर्तीच्या अधिन शासन प्रशासकीय मान्यता देत आहे. प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत असलेली कामे सोबतच्या जोडपत्र-१ मध्ये दर्शविण्यात आली आहेत.**

**२. अटी व शर्ती**

१) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांसाठी कार्यान्वयन यंत्रणा घुलेवाडी ग्रामपंचायत राहील.

२) सदर सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद केलेल्या कामांच्या अंमलबजावणीचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत माझी वसुंधरा अभियान संचालनालयास पाठविण्यात यावा.

३) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांची अंमलबजावणी प्रशासकीय मान्यता मिळाल्यापासून पुढील ६ महिन्यात पूर्ण करावी.

४) बक्षीस रकमेपेक्षा अधिकचा खर्च झाल्यास तो स्वनिधी मधून करण्यात यावा.

५) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास, त्यासाठी कोणताही वाढीव निधी / अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

३. माझी वसुंधरा अभियानांतर्गत घुलेवाडी ग्रामपंचायतीस "ग्रामपंचायत गट (१० हजारपेक्षा जास्त लोकसंख्या)" राज्यस्तरावर दुसऱ्या क्रमांकांचे रू १.५० कोटी व भूमी थीमॅटिक क्षेत्रात सर्वोत्तम कामगिरी बद्दल रू ७५.०० लक्ष अशी एकूण रू २.२५ कोटी रकमेचे बक्षिस प्राप्त झाले आहे. या बक्षीस रकमेपैकी रु. १.१२५० कोटी रकमेचा पहिला हप्ता त्यांना वितरीत करण्यात आला आहे. सदर बक्षीस रकमेमधून घ्यावयाच्या कामांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास उपरोक्त परिच्छेद-१ प्रमाणे शासनाने प्रशासकीय मान्यता प्रदान केली असल्याने घुलेवाडी ग्रामपंचायतीस बक्षिस रकमेचा उर्वरित रू. १.१२५० कोटी लक्ष (रुपये एक कोटी बारा लक्ष पन्नास हजार फक्त) रकमेचा दुसरा हप्ता महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळामार्फत वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०५२६११३७११६९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHAHEEN SHOUKAT JAMADAR
Digitally signed by SHAHEEN SHOUKAT JAMADAR
Date: 2025.05.26 12:42:28 +05'30'

**(शाहीन शौ. जमादार)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२

२) मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास), यांचेसचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२

३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन ), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२

४) मा. मंत्री, (पर्यावरण व वातावरणीय बदल),यांचे खासगी सचिव, मंत्रालय,मुंबई,-४०००३२

५) मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई
७) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई
८) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अहिल्यानगर.
१०) ग्रामविकास अधिकारी, घुलेवाडी ग्रामपंचायत
११ ) निवडनस्ती तां.क.१

## ***जोडपत्र- १***

शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक: अभियान-२०२४/प्र. क्र.०४(३८)/तां. क.१
दिनांक: २६ मे,२०२५ चे सहपत्र

| अ. क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रकीय खर्च रु. |
|---|---|---|
| १ | Proposed plantation at Ghulewadi Grampanchayat | १,१२,५०,०००.०० |
| २ | On grid solar- at ४ locations | २७,००,०००.०० |
| ३ | Solar high mast streetlight within grampanchayat limits | १७,७५,०००.०० |
| ४ | LED Solar streetlights within grampanchayat limits | ५६,५०,०००.०० |
| ५ | IEC | ११,२५,०००.०० |
| | **TOTAL** | **२,२५,००,०००.००** |